**<u>वाडी शेवाडी मध्यम प्रकल्प ता.सिंदखेडा,जि.धुळे</u>**
**द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव ...**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.सुप्रमा-२००९/५१२/(१५३/२००९)/मध्यम प्रकल्प
मंत्रालय, मुंबई ४४ ०३२,
दिनांक :- २६/०५/२०११.

पहावे :१) शासन निर्णय क्र.डब्ल्युएडी/१०८५/६९६/(३८८/८५)/ज.सं.अ., दिनांक २१/१/८९.
२) शासन निर्णय क्र.वाडी शेवाडी/१०९२/१३२०/(२८८/९२)/ज.सं.अ., दिनांक २१/१२/९२.
३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे निर्णय क्र.तापाविम-कास/प्र.ली.(४)/सु.प्र.मा./१९/म.प्र.१९९९, दि.६/४/९९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

धुळे जिल्हयातील सिंदखेडा तालुक्यातील वाडी शेवाडी मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्र. डब्ल्युएडी/१०८५/६९६/(३८८/८५)/जसंअ, मंत्रालय, मुंबई-३२, दिनांक २१/१/१९८९ अन्वये (दरसूची १९८५-८६) रुपये ११३२.१४ लक्ष (रुपये अकरा कोटी बत्तीस लक्ष चौदा हजार फक्त) एवढया किंमतीस मूळ प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतरचे काळात प्रकल्पास आर्थिक तरतुद न झालेने प्रकल्पास शासन निर्णय क्र. वाडी शेवाडी/१०९२/१३२०/(२८८/९२)/ज.सं.अ., दिनांक २१/१२/१९९२ अन्वये (दरसुची १९९१-९२) रुपये १९२४.४८ लक्ष (रुपये एकोणवीस कोटी चोवीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त) एवढ्या किंमतीस नव्याने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतरचे काळात दरसुचीतील वाढ, भुसंपादन दरात झालेली वाढ, व प्रकल्पाअंतर्गत केलेले तांत्रिक बदल यामुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ झाली. यासाठी तापी विकास महामंडळाने त्यांचे निर्णय क्र.तापाविम/कां.स./१९/म.प्र./१९९९, दि.६/४/९९ अन्वये (दरसुची १९९९-९९९) रु.९८४३.७१ लक्ष (रुपये अठ्ठयान्नव कोटी त्रेचाळीस लक्ष एकाहत्तर हजार फक्त) एवढ्या किमर्तीस प्रकल्पास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तद्नंतर ते आतापर्यंन्तच्या काळात दरसुचीतील बदल, भुसंपादन दरातील वाढ, जास्त दराची निविदा स्विकृती, संकल्पनातील बदल इत्यादी बाबीमुळे प्रकल्पीय किंमतीमध्ये वाढ झाली. यासाठी कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांनी त्यांचे पत्र क्र.तापाविम/प्रशा-७/१७५७, दि.२७/५/२००९ अन्वये प्रकल्पाचा द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता अहवाल मंजुरीसाठी सादर केलेला असून, त्यास मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय</u>** :-

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे धुळे जिल्हयातील सिंदखेडा तालुक्यातील वाडी शेवाडी मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित रु.२५८३३.१३ लक्ष (रुपये दोनशे अठ्ठावन्न कोटी तेहतीस लक्ष तेरा हजार फक्त) एवढया रकमेस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये २२३५९.९३ लक्ष (रुपये दोनशे तेवीस कोटी एकोणसाठ लक्ष त्र्यान्नव हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रुपये ३४७३.२० लक्ष (रुपये चौतीस कोटी त्र्याहत्तर लक्ष वीस हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारित सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२. या योजनेस प्रदान केलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.२(२०११-१२) वर नोंदविण्यात आली आहे.

३. या प्रकल्पामुळे धुळे जिल्हयातील सिंदखेडा तालुक्यातील अवर्षण प्रवण क्षेत्रातील ५९८० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण १.५४ आहे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५/४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च-८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०२) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७६३) वाडी शेवाडी मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण १०९९/(१२६/९९)मोप्र(प्र) दिनांक १८.५.९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार आंतरवित्त सल्लागार तथा सह सचिव यांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०५२६१६००१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

**( म.गु.वानखेडे)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
वित्त विभाग (व्यय-१२) (अर्थ-२), (अर्थ-१०), (व्यय-६ अ), मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई,
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे (सोबत सुधारित अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, धुळे मध्यम प्रकल्प विभाग क्रमांक-१, धुळे,
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-२) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन मध्यम प्रकल्प, संग्रहार्थ
निवड धारिका.

**तक्ता क्रमांक १**

**वाडी शेवाडी मध्यम प्रकल्प ता.सिंदखेडा जि. धुळे**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२००९/५१२/(१५३/२००९)/मध्यम प्रकल्प,**

**दिनांक २६ /५/२०११ चे सहपत्र**

**द्वितीय सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | “अे” प्राथमिक सर्वेक्षण | १२३.०३ |
| २) | “बी” भूसंपादन | ७७३३.३२ |
| ३) | “सी” कामे | ७८५४.५९ |
| ४) | “डी” विमोचक | ३१७.६८ |
| ५) | “ई ” फॉल्स | १०.७३ |
| ६) | “एफ” आर.एच.टी.कामे | २८४०.६६ |
| ७) | “जी” ब्रिजेस | ४७६.५३ |
| ८) | “एच” एस्केप | १४०.१३ |
| ९) | “के” इमारती | ८३.३२ |
| १०) | “एल” मातीकाम | ८२६.३७ |
| ११) | “एम” वृक्षारोपण | १४.४० |
| १२) | “ओ” संकिर्ण | ८३.०६ |
| १३) | “पी” देखभाल व दुरुस्ती | ७०.८५ |
| १४) | “क्यू” हत्यारे व संयत्रे | ४०.६७ |
| १५) | “आर” दळणवळण | ७६.९० |
| १६) | वितरीका भाग-३ व पाटचाऱ्या | १६६७.६९ |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | २२३५९.९३ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ३४७३.२० |
| | **एकूण** | **२५८३३.१३** |

**तक्ता क्रमांक २**

**वाडी शेवाडी मध्यम प्रकल्प ता.सिंदखेडा जि. धुळे**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२००९/५१२/(१५३/२००९)/म.प्र., दि.२६ /५/२०११ चे सहपत्र**

**द्वितीय सुधारित अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे<br>३) वितरीका व पाटचाऱ्या | <br>१५४८९.१३<br>५२०३.११<br>१६६७.६९ |
| | **एकूण (अ)** | **२२३५९.९३** |
| (ब) | **अधिक**<br>१) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) १८.०० टक्के<br>२) हत्यारे व अवजारे ५.५ टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून<br>३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ०.३५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>२३३२.६०<br>४६३.२१<br>८१.६४<br>२०.९२ |
| | **एकूण (ब)(३+४+५+६)** | **२८९८.३७** |
| | **एकूण (अ+ब)** | **२५२५८.३०** |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>२६.३७<br><br>१.१०<br>२.९५ |
| | **एकूण वजाती** | **(-) ३०.४२** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब)-क** | **२५२२७.८८** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.०० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.०० टक्के (प्रथमशिर्ष व व्दितीय कालवड किंमतीवर)<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>३८६.६७<br>२०६.९२<br>११.६६ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | **६०५.२५** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **२५८३३.१३** |